**राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प अंतर्गत बहुउद्देशीय निवारण केंद्र स्थानावर स्थानिकांना प्रक्षिण देणे तसेच शासकीय अधिका-यांना आपत्ती व्यवस्थापनविषयक क्षमताबांधणी संदर्भात प्रशिक्षण देणे बाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१८/प्र.क्र.२५८/आव्यप्र-१**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि.१६.२.२०१९

वाचा :- महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०१८/प्र.क्र.२५८/आव्यप्र-१, दि ७.१.२०१९.

**शासन निर्णय:-**

१) राष्ट्रीय चक्रीवादळ धोके निवारण प्रकल्प राज्यात राबविण्यात येत असून संदर्भाधिन शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टात नमूद २२ जिल्हयातील शासकीय अधिका-यांना प्रशिक्षण आपत्ती व्यवस्थापन प्रशिक्षण देण्यासाठी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) यांना रू. ८५,५०,०००/- (रुपये पंच्चाऐंशी लाख पन्नास हजार फक्त) तसेच उर्वरित १४ जिल्हयांपैकी वर्धा आणि नंदूरबार या जिल्हयातील शासकीय अधिका-यांना प्रशिक्षण देण्यासाठी ऑल इंडिया इन्स्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गर्व्हन्मेंट यांना रू. ३९,५०,०००/- (रुपये एकोणचाळीस लाख पन्नास हजार फक्त) अशाप्रकारे एकूण रु. १,२५,००,०००/- (रुपये एक कोटी पंचवीस लाख फक्त) यांना अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२) लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांनी वरीलप्रमाणे निधी यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा) आणि ऑल इंडिया इन्स्टीटयुट ऑफ लोकल सेल्फ गर्व्हन्मेंट यांना वितरीत करावा.

३) श्रीमती खोत, लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, आणि श्रीमती राजेश्री राऊत, वित्तीय सल्लागार व सह सचिव यांना वरील निधी आहरीत करण्यासाठी अनुक्रमे आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४) या कामी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५ नैसर्गिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य ८०- सर्वसाधारण, १०२-आपत्ती प्रवण क्षेत्रामध्ये नैसर्गिक आपत्कालीन परिस्थितीबाबतच्या तातडीच्या योजनांचे व्यवस्थापन करणे (०७) (०१) धोके प्रवणता व्यवस्थापनासाठी तांत्रिक सहाय्य (२२४५-२६१२) ३१ सहाय्य अनुदाने या लेखाशिर्षाखाली पूरक मागणीद्वारे प्राप्त झालेल्या निधीतून करण्यात यावा.

५) सदर आदेश नियोजन आणि वित्त विभागाच्या सहमतीने नियोजन विभाग, अनौपचारीक संदर्भ क्र. अनौस २४/१४७५, दि. २७.०१.२०१९ वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ५६/२०१९/व्यय-९ दि. ७/२/२०१९ अन्वये निगर्मित करण्यात येत आहे.

६) सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९०२१८१५१३१८३७१९ असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrirang Shripati Gholap

Digitally signed by Shrirang Shripati Gholap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DMU/R AND R, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e1b6e289fe7dcde27c972916398d8220a134ed8ebf6439e54d1927c5c4b28bec, cn=Shrirang Shripati Gholap
Date: 2019.02.18 15:15:12 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, उर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. विभागीय आयुक्त
७. मुख्य अभियंता, (विशेष प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन फोर्ट, मुंबई.
८. वित्तीय सल्लागार व सह सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आव्यप्र-१, संग्रहार्थ.